

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्रशासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय,
३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१
रजि नं. एफ १६०९४ (मुंबई)
दूरध्वनी : २२६५३९६६ / फॅक्स : २२६३१३२५
Email rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क्र./ २०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

०१ सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

०२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

०३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

०४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# जा हि रा त.

**काव्येतिहास संग्रहाच्या** मागील अंकांकरितां पुष्कळ मागणी येतात. परंतु प्रती शिल्लक नसल्यामुळें पुस्तकें देतां येत नाहींत. याजकरितां **संग्रहाची** दुसरी आवृत्ति काढण्याचा आमचा विचार आहे. तेव्हां प्रथम पासून तों सन १८८२ साल्च्या अखेरी पर्यंतचे सर्व अंक ज्यांस पाहिजे असतील त्यांणीं आम्हांस आपलें नांव आपल्या पत्त्यासह कळवावें. दर वर्षाची किंमत रुपये ३ प्रमाणें पांच वर्षांची एकंदर किंमत रुपये १५ पडेल. तीनशें [illegible]रांच्या सह्या आल्या बरोबर ही दुसरी आवृत्ति छापण्यास आरंभ करूं. आवृत्ति छापून तयार झाल्यावर टपाल खर्च काय पडेल तो संग्रहाचे मळपृष्ठावर कळविला जाईल. कळावें. तारीख १२ सप्तंबर सन १८८३.

**का० सं० व्यवस्थापक.**

---

## विषयक्रम.

३. **संस्कृत**—या भागांत **शिवकाव्याचें** पूर्वार्ध संपलें. हें काव्य ऐतिहासिकच आहे. या पूर्वार्धांत **शाहू महाराजांचे** अखेरी पर्यंत सर्व मराठी राज्याची हकीगत आहे. पुढील राजांचें संक्षेपरूप वर्णन आहे. ह्याचें उत्तरार्ध पुढील सालीं सुरू राहील. शिवाय **शंकराचार्यांची** प्रकरणे **अनेके** या सदराखालीं बरींच आहेत. आणखींही आम्हांस उपलब्ध झालेलीं आहेत. **विठोबा** अण्णा यांचा एक ग्रंथ रामायण आम्ही पूर्वी छापिला आहेच. हल्लीं **सुश्लोकलाघव** हा सुरू आहे. तो ग्रंथ पुढील सालीं खलास होईल.

या भागाकडे **संग्रहाचीं** पृष्ठें कमी द्यावीं, किंबहुना मुळींच देऊं नये, अशा सूचना पूर्वीपासून आम्हांस आहेत. त्याप्रमाणें आम्हीं संस्कृताचीं ८ पृष्ठें कमी करून इतिहासाकडे देण्याचें योजिलें आहे. यावरून आमची संस्कृतावर भक्ति कमी आहे, किंवा त्याची आम्हांस जरूर नाहीं, असें कोणी समजूं नये. तसें असतें तर आज पर्यंत हा भाग ठेविलाच नसता. परंतु संस्कृत पुस्तकें धुंडून काढून त्यांचें पुनरुज्जीवन करण्याकडे आमचे सरकारांतून बराच पैका खर्च होत असून तें काम सुज्ञ गृहस्थांकडे सोंपविलेलें आहे. शिवाय संस्कृत ग्रंथ मिळविण्याचे व त्यांचें पुनरुज्जीवन करण्याचे दुसरे प्रकारचेंही उद्योग आपले देशांत सुरू आहेत. तसे इतिहास अगर मराठी कविता यांचे नाहींत. हें मनांत आणून आम्हीं या भागांतील ८ पृष्ठें कमी करण्याचा विचार केला आहे. आश्रय नीट मिळाल्यास या भागाकडे ८ पृष्ठें अधिक देऊं.

४. **मासिक** पुस्तकें वेळच्या वेळेस निघत नाहींत व त्यामुळें वर्गणीदार वर्गणी देण्यात मागें पुढें करितात असा बोभाटा असल्यावरून आम्हीं विशेष लक्षपूर्वक ह्या पुस्तकाचे अंक वेळचे वेळेवर आश्रयदात्यांकडे दाखल व्हावे अशी तजवीज आज १।२ वर्षें केली. तथापि बरेच लोकांकडून वर्गणी वेळचे वेळेस येत नाहीं इतकेंच नाहीं, पण पांच पांचदां सात सातदां बिलें गेलीं असतांही दोन दोन तीन तीन वर्षांच्या बाकया अद्याप येणें आहेत. ही स्थिति पुनः कळविण्यास आम्हांस फार फार दिलगिरी वाटते. ह्या संग्रहाच्या उदाहरणावरून वरील बोभाटा वर्गणीदार वृथा करितात असें अनुमान करण्याची पाळी न येवो इतकीच विनंति आहे. इकडे लक्ष देऊन मागील सर्व बाकीचा निकाल आमचे आश्रयदाते करतील अशी फार उमेद आहे. संग्रहाचें काम किती खर्चाचें व श्रमाचें आहे, इकडे थोडेसें लक्ष दिलें तर आमचें मागणें गैरवाजवी बिलकुल नाहीं, अशी खात्री होईल. वेळच्या वेळीं आश्रयदात्यांनीं कृपा केल्यास स्वीकृत उद्योग उरकण्यास आम्हांस विशेष उत्तेजन येईल.

५. आमच्या मित्र मंडळीनें पुष्कळ प्रकारें आमचें साहाय्य केलें याबद्दल आम्ही त्यांचे फार फार आभारी आहों. हें काम एका दोघांचें नाहीं, दसका लकडी एका बोजा असें आहे, हें समजून ते आम्हांस नाना प्रकारे मदत करितात ह्याबद्दल आम्ही त्यांची तारीफ करून त्यांचे आभार मानितों.

६. याप्रमाणें आ ... ाम अर्धें तप पर्यंत पार पडलें. याचप्रमाणें पुढेंही सुयंत्र चालेल अशी ईश्वरचरणीं ... ना करून, व आश्रयदात्यांचे आभार मानून हा लेख पुरा करितों.

**जनार्दन बाळाजी मोडक.**

**काशिनाथ नारायण साने.**



अनुक्रमणिका

# आम्ही आरंभिलेल्या कामाविषयीं अभिप्राय.

मागील अंकावरून [ पुढें चालू. ]

आपली जो काव्यभाग आहे, त्यामध्यें ज्या संस्कृत व प्राकृत प्रकरणांचा आ पण आजपर्यंत संग्रह केला आहे, तीं बऱ्याच प्रकारें उपयोगीं आहेत. विशेषें करून **मुक्तेश्वराचें** सभापर्व फारच मनोरम आहे, परंतु याविषयीं दोन गोष्टी मला आमणांस सुचवावयाच्या आहेत, त्या ह्या कीं, **मोरोपंत** कृत **मंत्ररामायण** व **मुक्तेश्वर** कृत **वनपर्व** इत्यादि मोठमोठ्या विस्तीर्ण ग्रंथाचा संग्रह करण्याचा यत्न केला असतां, तीं लौकर संपत नाहींत, व अल्प प्रकरणांस जितकी जागा मिळावी तितकी मिळत नाहीं, या करितां असे ग्रंथ स्वतंत्र रीतीनें छापले पाहिजेत. ते अशा प्रकारच्या मासिक पुस्तकांत येणें सोईवार नाहीं. दुसरें, जीं अल्प प्रकरणें यांत छापावयाचीं, तीं संस्कृत असोत किंवा प्राकृत असोत, तीं जर शृंगाररसयुक्त असतील, तर त्यांतील शृंगार संभावित रीतीस अनुसरून असेल तरच प्रसिद्ध करावीं, नाहीं तर तें काम **अनंतफंदीकृत** लावण्या वगैरे छापणारांसारख्याकरितां ठेवावें. कारण आपलीं हीं मासिक पुस्तकें प्रायः लहान थोरांपासून सर्व वाचीत असतील असें मला वाटतें. याकरितां उत्कट–शृंगार–युक्त काव्यें अल्प समजुतीच्या मनुष्यांनीं वांचलीं असतां त्यांचीं मनें बिघडतील, हा परिणाम कोणासही इष्ट असेल असें मला वाटत नाहीं. एतदर्थ अशा प्रकरणाचा संग्रह करणें टाळवेल तर टाळावें. या गोष्टीकडे आपण लक्ष पुरवाल अशी मी आशा करितों

पूर्वीं रा० रा० **माधव चंद्रोबा** यानीं **महाराष्ट्र** काव्यांचा संग्रह छापण्याचें जें मोठें स्तुत्य व परोपकारिक काम आरंभून बरेंच सिद्धीस नेलें असून सरकारचा आश्रय कमी झाल्यामुळें बंद पडलें होतें, तें पुनः आपण हातीं धरून सिद्धीस नेत आहां, हें आपलें काम फार चांगलें असून **महाराष्ट्र**भाषाप्रिय जनांवर आपला हा खरोखर उपकार आहे. आपला हा **काव्येतिहाससंग्रह** सर्व **महाराष्ट्रीय** लोकांच्या व विद्या खात्याच्या उदार आश्रयास पात्र आहे, असें मला निःसंशय वाटतें. ईश्वर करो आणि आपला सत्हेतु सिद्धीस जावो. कळावें लोभ असावा हे विनंती.

पुणें ता० १ माहे नोवेंबर
सन १८७९ इसवी.

**वामन आबाजी मोडक.**

भौंचे [ यांस ] बोलावून आणून डेरियांत मारिलें. रामचंद्र नारायण प्रभु कारभारी होते त्यांस धरून आणून बेडी घांतली.

या समयांत अबदाली गिलच्या दिल्लीवर चालून येतो ह्मणून कुमक करण्याचीं पत्रें पादशहाचीं आलीं. या नंतर रघुनाथ बाजीराव हिंदुस्थानांत स्वारी करितात, मोठा पराक्रम आटकेपर्यंत जाऊन [ करून ] आले. सदाशिवराव भाऊही पराक्रमी, परंतु घरचें कारभार करणें व महाराज सुटावयाचा उद्योग न करिता आपणच सर्व राज्य आटोपावें हें अयोग्य करणें [ यांत ] मसलत पडती हें अयुक्त, कल्याणदायक नाहीं, महादोबा पुरंदरे घरीं बसविले, इत्यादि विकल्प आंतून मनांत प्रधान पंतीं आणोन बोलों लागले. तेव्हां सदाशिव पंत यांणीं आपण जाऊन पादशाहीचा बंदोबस्त करून दिल्लींत अंमल बसवून हिंदुस्थान निरंकुश करून येऊं ऐसें बोलणें घातलें. विश्वासराव बरोबर द्यावे ह्मणोन फौजेची तयारी करून बहुत फौज, तोफखाना, सरदार शिंदे, होळकर, गारद जंगी सामान घेऊन ठेंथावर ध्वज लावून निघाले. ते हिंदुस्थान प्रांतीं चालले. बरोबर त्रिंबकराव सदाशिव पुरंदरे, बळवंतराव गणेश व महिपतराव आवजी चिटणीस व बाळाजी जनार्दन फडणीस हे कारभारी दिल्हे. व लक्ष्मण बल्लाळ भवानी शंकर ही बराबर दिल्हे.

या समयीं हबशी यांणीं बिघाड करून मावळ वगैरे जागां स्वारी करूं लागले. त्याजवर रामाजी महादेव व शंकराजी नारायण व माणकर हशम वगैरे देऊन रवाना केले. मानाजी आंगरे वजारतमाब यांस कुमकेस जावें असें लिहिलें. व आरमार पाठवून हबशी जेर केले. तेव्हां तह केला. उंदेरी किल्ला त्यांजकडे होता तो जेर करून घेतला.

सदाशिवराव भाऊ व विश्वासराव दर मजल गेले. त्या प्रांतीं जयाजी शिंदे व त्यांचे लेक जनकोजी शिंदे व त्यांचे चुलते दत्ताजी शिंदे व मल्हारजी होळकर होते ते फौज सुद्धां येऊन भेटले. ताऊण लाख फौज जमा जाली. या उपरि दरमजल जाऊन दिल्लीस पावले. अहमदशहा कैद करून अलम-

---

८४. हा भाचा असून मुजफरखानाच्या कन्येशीं त्याचें लग्न झालेलें असावें किंवा लग्न करण्याचें ठरलें असावें.

८५. हा परभू गृहस्थ ह्या कृत्यांत सामील होता.

८६. ही गोष्ट वरील उदगिरीच्या मोहिमेच्या पूर्वी झाली.

८७. ह्या प्रसंगास अनुलक्षून पेशव्यांच्या घराण्याची हकीगत जेथें जेथें येते तेथें तेथें ती अस्पष्ट व घोंटाळ्याची असते. भाऊ साहेबांची बखर पृष्ठ ८५ ते ९० पहा.

८८. " स्थावर " असें मूळांत दिसतें.

८९. जयाजी व दत्ताजी हे या पूर्वीच सरकार कामास आले होते. जयाजी हा मारवाडांत नागूर येथें मारेकऱ्यांच्या हातून मरण पावला. दत्ताजी दिल्ली नजीक दुराणींशीं लढतांना पडला. भाऊ साहेबांची बखर पृष्ठ १७ व ७० पहा.

गीरे[10] यास पादशाहीवरि बसविले. दिल्ली भोंवतीं गीर्द[11] फौजेची देऊन बहुत पैका घेतला. पादशहाचा खर्च नेमून देऊन आपला बंदोबस्त अंमल केला. पादशाही तख्त व दिवाणाखाना यास सोनें रुपें दहा वीस लक्षांचें होतें तें काढून फौजेस वाटलें. ते समयीं त्रिंबकराव सदाशिव व होळकर वगैरे बहुतांनीं तख्त फोडूं नये असें सांगितलें. तेव्हां आमचें तख्त रायगडचें त्याचें सोने रुपें काढून नेलें. हें काढावयाचें, आणि विश्वासराव यांस तख्तावर बसवावयाचे ऐशीं बहुत उमेदीचीं भाषणें केलीं. आणि खजीनाही काढला. बाळोजी पलांडे बादशहापाशीं कारभारी आपले ठेविले. विठ्ठल शिवदेव कांहीं फौज देऊन शहरचे बंदोबस्तास ठेविले. दोन महिने दिल्लींत राहिले.

तों गिलचे चालून आले त्यांजवर फौज सुद्धां चालून गेले. मध्यें कुंजपुरा येथें कुतुबशा पठाण दहा वीस हजार फौजेनिशीं होते त्यास मोर्चे लाविले. हल्ला करून कुंजपुरा घेतला. तेव्हां कुतुबशा लढाईस चालून आला त्यास मारून लुटून घेतले. गर्दीस मेळविले. लूट व द्रव्य बहुत सांपडेले. या समयीं अबदाली गिलच्या लाख फौजेनिशीं आले. त्याजवर दिल्लीहून निघोन पाणपतावर गेले. तों अबदाली पास सुजाउद्दौला, उमरावगिरी गोसावी व नजीबखान रोहिले सामील जाले. पादशाही बुडविली, पठाण कापून काढिले, मराठी फौज वेढा देऊन रसदबंद करतील, व पळतील, मुलुख मारतील, याचा विचार कसा करावा, हा गिलच्यास विचार प्राप्त जाला. तेव्हां मल्हारजी होळकर यांजकडे वकील पाठवून सलुख्याचें बोलणें लाविलें. दोहींकडील फौज भारी. रसद बंद जाली. पैका मुबलग, परंतु दाणा मिळेना. महागाई पडली. तेव्हां गोविंद बल्लाळ बुंदेले यांस लिहिले. ते फौज खजिना रसद घेऊन निघाले. हे बातमी गिलच्यास कळली. त्यांनीं बुंदेले यांजवर फौज रवाना केली. वाटेत गांठून लढाई जाली. गोविंदराव बल्लाळ मोडले. त्यांस धरून शिर कापून नेलें[14] ! खजीना व रसद फौज लुटून घेतली. लढाई मातबर झाली. पांच हजार गिलचे कापून काढिले. परंतु यश आलें नाहीं. गिलचे यांचें बोलणें होळकर यांचे विद्यमानें तीन कोट रुपये तुम्हीं घेऊन माघारें जावें, आम्ही पादशाही बंदोबस्त करूं, असें लागलें. तें यांस मानेना. वीरश्रीस पडले. भोंवता खंदक करून, तोफा मांडून, रहावें ऐशी मसलत केली. तेव्हां सर्वत्र बोलले जे, "अशी लढाई करणें आपले फौजेचे [ हातुन ] कधीं शिवाजी महाराजांपासून

१०. अलमगीर याजबद्दल 'जवानबख्त' असें असावें.

११. गीर्द=चौकी, पहारा.

१२. भा० सा० ब० पृष्ठ १०० ते १०२ पहा.

१३. यांचें आडनांव खेर. यांजकडे झांशी, सागर वगैरे प्रांत होता.

१४. भाऊसाहेबाची बखर पृ० १०७ पहा.

अनुक्रमणिका

आजपर्यंत जालें नाहीं. दूर राहोन मोंगलास वेढोन जेर करावें." मल्हारजी होळकर यांणींही बहुत प्रकारें सांगितलें, "ये समयीं पैका तीन क्रोड येतो तो घेऊन कांहीं दिवस मसलत संवरून करावी." तें न ऐकतां, जनकोजी शिंदे यांचे चुलते दत्ताजी शिंदे भागीरथीचे घांटें गिलचे पूल करून येणार म्हणोन घांटावर ठेविले. त्यांजवर गिलचे यांणीं फौज पाठविली. लढाई बहुत जाली. दत्ताजी शिंदे त्या लढाईत पडले. जाटाची फौज मदतीस आली. तेव्हां यांची मसलत वांकडी आहे, खंदक करून गनीमी फौजेशीं लढणें घडणार नाहीं, म्हणोन निघोन गेले. अबदाली गिलच्या यांणीं लढाईस आपले लोक चाळीस हजार फौज देऊन रवाना केले. तहाचें बोलणें ऐकत नाहींत, होळकर मध्यस्त केले, तेव्हां लढाई देणें प्राप्त म्हणोन पाठविले. ते चालून आले. त्यांजवर बळवंतराव गणपत फौज देऊन रवाना केले. मागून जनकोजी शिंदे फौज देऊन पाठविले. बळवंतराव यांची त्यांची गांठ पडली. लढाई जाली. त्यांत बळवंतराव यांचा मोड होऊन शीर कापून[९६] नेलें. हें कळतांच जनकोजी शिंदे जाऊन बहुत शर्तीची लढाई करून गिलचे कापून काढिले. मोडले. त्यांचे लोकांचें शीर कापून आणिलें. गिलच्या कडील सरदार फौज उठोन येऊं लागली[९७]. हें आपण ठेऊं नयेत म्हणोन सर्वांनीं सांगितलें. परंतु ऐकिलें नाहीं. पांच हजार लोक एकदम आले. तेहि[९८] ठेविलें. गिलच्यांस भागीरथीनें उतार दिल्हा. ते आलिकडे चालून आले. ते समयीं देशीं लिहिणें, कुमक बोलावणें, किंवा लांब जाऊन त्यांचे भोंवतें फिरणें हें विरेस पडोन सोडिलें. प्रधानपंत यांस पत्र देखील येईना[९९]. तेव्हां सावकारी बातमी आली. यावरि नाना प्रधान पूर्वील विमनस्कता चि-[त्तांत] आणोन कशास जावें[१००] बोलले. तेव्हां महादोबा पुरंदरे यांणीं सांगितलें जे, सर्व लोक बुडाले, विश्वासराव गेले. आतां विचार न करितां निघावें. म्हणोन सांगितलें. त्याजवरून निघण्याचा विचार करून निघाले. इकडे सदाशिवपंत

---

९५. भा० सा० ब० पृष्ठ ४५ ते ७० पहा.

९६. हे बळवंतराव मेहेंदळे प्रसिद्ध आपा बळवंत यांचे तीर्थरूप. बळवंतराव व त्यांची स्त्री यांचें परस्पर प्रेम फार होतें. यांच्या शेवटच्या प्रसंगाची हकीकत वाचून अंतःकरण कळवळून येतें व भारती स्त्रीपुरुषांचें स्मरण होतें. आपा यावेळीं १२ वर्षांचे होते. भा० ब० पृ० ११४-११६ पहा.

९७. मराठ्यांकडे.

९८. ह्या बद्दल दुसरे ठिकाणीं कोठे दाखला नाहीं मात्र विंचुरकर यांजकडे कांहीं दुराणी लोक होते ते मात्र पुढें प्रसंगीं फितूर झाले असें कोठें कोठें आढळतें.

९९. विश्वासराव यांणीं पत्र लिहिलें होतें. परंतु भाऊंस हें कळल्यावर त्यांणीं तो क्रम बंद करविला. भा० ब० पृ० १०६ पहा.

१००. ही गोष्ट ध्यानांत ठेवण्या जोगी आहे. तथापि दोघांमध्यें अशा प्रकारचें वितुष्ट असल्याचा दुसरा दाखला आढळत नाहीं.

भाऊ यांचे लष्करांत रसद येऊन पावेना. चहूं कडून गिलचे यांच्या फौजा हिंडूं लागल्या. तेव्हां सर्व सरदार समशेर बहादूर व येशवंतराव पंवार व जनकोजी शिंदे व दमाजी गायकवाड व खंडेराव दरेकर सरलष्कर, घाटगे, निंबाळकर, पाटणकर, व दाभाडे व भोंसले सर्व सरदार त्रिंबकराव सदाशिव, महिपतराव आबजी चिटणवीस व लक्षुमण बल्लाळ यांनीं विचार केला जे, लढाई देणें त्या अर्थी बसोन खराब होऊं नये. इब्रामखान गारदी व सरदार सुद्धां चालोन जाऊन लढाई द्यावी. म्हणोन शके १६८२ विक्रमनाम संवत्सरे सन इहिदे सितेन मया व अलफ पौष शुद्ध दशमीस¹ पुढें तोफखाना, त्याचे मागें गारद, त्याचे मागें फौज ऐशी करून चालोन गेले. तोफांचे मारगिरीनें गिलचे बहुत मारिले, जेर केले. तेव्हां त्यांनींहि निश्चय करून चालून येऊन गारदी यांजवर घोडे घालून कापले. इब्रामखान याचा हात उडाला असतां लढाई मारिली. हे शेवट ठार³ जाले. तेव्हां गिलचे पुढें चालले. हें पाहून विश्वासराव यांणीं हत्ती चालविला. मानकरी हुजरात फौज यांणीं फितूर ठरविले⁴ त्यांनीं जोडगोळ्या अंबारींत टाकिल्या. विश्वासराव ठार जाले. पडले. हें वर्तमान सदाशिवपंत भाऊंस कळतांच या उपरि काय वांचावयाचें म्हणोन जनकोजी शिंदे व समशेर बहादर ऐसे घोडे चालविले. बहुत लोक कामांस आले⁵. लढाई मातबर जाली. तों फौजेचा धीर सुटला. सरदार मागें कोणी नाहीं. विश्वासराव पडले. भाऊही लढाईंत मिसळले. म्हणोन पळूं लागले ते समयीं गर्दी जाली. भाऊ व समशेर बहादर व जनकोजी शिंदे ठार जाले. ठिकाण नाहीं. गिलचे शेरे⁶ होऊन बहुत लोक मारिले. लुटूं लागले. फौज बुनगे सर्व लुटून बायका सर्व नेल्या. बाटविल्या. ज्यांनीं हत्यार टाकिलें त्यास सोडावें ऐशी ताकीद गिलच्यांनीं केली. त्यांत दहा हजार माणूस जखमी लागले. ते निघाले. बाकी पाऊण लाख फौज सर्व बुडविली. शके मजकूर. मल्हारजी होळकर कांहीं फौजेनिशीं निभावून निघाले. त्रिंबकराव सदाशिव व महिपतराव चिटणवीस व बाळाजी जनार्दन फडणवीस व दमाजी गायकवाड हे जखमी जाले. आणि कंगालांत निघोन भिंड येथें बहुत प्रयासें पंधरा दिवस, कोणास महिना, अन्न नाहीं व वस्त्र नाहीं ऐसे लोक येऊन भिंड येथें राहिले.

या समयांत गिलच्या भारी, खंदक करोन विरेस पडोन भाऊ लढणार म्हणोन

---

१. 'पौष शुद्ध ८मी' असें असावें.
२. 'काकडे' चि० प्र०.
३. 'हें शेवटवर झालें' चि० प्र०
४. 'फितूर ठेविले' इं० प्र० दोनीही पाठ अस्पष्ट आहेत.
५. कामास आले=लढाईंत पडले.
६. शेर=( वाघ, सिंह ) वरचढ, विजयी.

पंतप्रधान कांहीं फौज तयार करून मागें जावें म्हणोन निघाले. वराडप्रांताकडोन जानोजी भोंसले आणिले. तेही आले. त्या मार्गेंच पुढें जावें ऐशी सल्ला महादोबा पुरंदरे यांणीं दिल्ही. तसेंच चालले. सुरुंज भेलसें या मैदाना पावेतों गेले. तों तिकडून पाणपतीं फौज बुडाली हें वर्तमान आलें. तेव्हां बहुतच पुत्र बंधु गेले, फौज सरदार सर्व बुडाले, हें बहुत दुःख जालें. भेलसें येथें पळांतील लोक आले. ते कांहीं फौज पाठवून आणिले. ते येऊन भेटले. त्यांचा सन्मान बंदोबस्त केला. पुढें मसलत करणें ते देशीं जाऊन सांवरल्या वांचून होत नाहीं, छावणी करून रहाणें ठीक नाहीं. ते समयीं प्रधानपंत यांचे चित्तास भ्रम जाला. शरिरीं पीडा जाली. तेव्हां परत देशीं आले. पुढें ग्वालेरी पर्यंत फौजा पाठवून सर्व पळ निभावून आणिला. होळकर व त्रिंबकराव सदाशिव येऊन पावले.

या नंतर पुढें जावयाचा निजध्यास प्रधानपंत यांणीं धरिला. श्रीप्रयागीं जावें, तेथें नावेमध्यें बसोन नावं बुडवावी ऐसे चित्तभ्रमें करून विचार बोलों लागले. तेव्हां सर्वांनीं विचार ठीक दिसत नाहीं, ऐसा निश्चय करून 'पुढे कूच जालें' ऐसें समजावून दरमजल पुण्यास येऊन पावले. या नंतर महादोबा पुरंदरे यांस क्षय होऊन ते वारले. शके १६८२ विक्रमनाम संवत्सरे सन इहिदे सितेन मया व अल्लफ. त्यांस पुत्र नीळकंठ महादेव होते. दिल्लीस नजीबखान रोहिले व सुजाउदोले यांणीं सर्व पराक्रम केला. गिलचे निघोन आपले स्थळास गेले. दिल्लीस पादशाहा अल्लीगवर बसविले. शके मजकूर.

बाळाजीपंत नाना यांणीं विचार मनांत आणिला जे, आईसाहेब यांणीं आग्रह करून राजे कैदेंत ठेविले. सदाशिवपंत भाऊही त्या संमतांत मिळाले. त्या योगें अशी गोष्ट जाली. आपलेंही शरिरीं स्वस्थ नाहीं. रामराजेही राज्याचा आटोप करावया जोगे नाहींत. त्यास दुसरे राजे मांडीवर घेऊन बसवावें त्यांचें राज्य त्यांनीं करावें. म्हणोन महादजी राजे खानवटकर आणोन बसवावे. याचा सिद्धांत करून माधवराव पुत्र व त्रिंबकराव सदाशिव नाना पुरंदरे यांस सातारां रवाना केलें. गोविंदराव चिटणवीस यांस पत्र पाठविलें. त्यास त्याजवळ राहिलेन चिटणवीस जिवबा यांचे पुत्र व लक्ष्मणराव तुमचे पुत्र यांस महाराजांपाशीं ठेवून तुम्हीं यावें म्हणोन पाठविलें. शके १६८३ वृषानाम संवत्सरे सन इसन्ने सितैन मया व अल्लफ छ १९ रमजान माधवराव सातारियास आले. आई

७. प्रतिकुल प्रसंग येऊं लागले म्हणजे एकदम येतात. ही गोष्ट या सालीं व पुढें १७१४-१५ सालीं जीं थोर कर्तीं माणसें टपटपां नाहींशीं झालीं त्यावरून स्पष्ट होते.

८. राजपक्षाच्या लोकांचा असा तर्क होणें साहजिक आहे.

९. 'इसन्ने तिसैन' चि० प्रतींत आहे तें चुकीचें आहे.

साहेब यांचे मर्जीचा विचार पाहिला. तों त्यांचे चित्तांत दुसरा दत्तक करावयाचा नाहीं असा आग्रह दिसला. इतक्यांत प्रधानपंत यांस क्षयाची व्यथा होऊन ते वारले. तेव्हां माधवराव निघोन पुण्यास परत गेले. दत्तक करण्याचें प्रकरण राहिलें. शके मजकूर.

आईसाहेब असतां कारभारी जवळ ठेविले [ते] प्रथम त्रिंबकराव विश्वनाथ, या नंतर त्रिसाजीपंत, याजवर गोविंदराव गोखले, यानंतर त्र्यंबकाजी माणकेश्वर पोतनीस, विष्णु नरहर याप्रमाणें ठेविले होते. संभाजीराजे करवीरकर वारले. शके १६८२ विक्रमनाम संवत्सरे मार्गशीर्ष शुद्ध १२.

यानंतर बाळाजीपंत नाना यांचे उत्तरकार्य दानधर्म बहुत करून दिवस संपादून माधवराव बल्लाळ व नारायणराव बल्लाळ व रघुनाथ बाजीराव होते त्यांणीं केलें. नंतर त्रिवर्गही सातारियास आले. महाराजांस नजरा मेजवान्या केल्या. आणि तेथील खर्चाचा वगैरे बंदोबस्त करून देऊन माधवराव यांस प्रधानपदाचीं वस्त्रे महाराजांनीं दिल्हीं. शके १६८३ वृषनाम संवत्सरे आषाढ शुद्ध ५. रघुनाथराव पंडित किताब वस्त्रे दिल्हीं. नीळकंठ महादेव यांस पेशवाईचे मुतालकीचीं वस्त्रे दिल्हीं. आपले दौलतीचे बंदोबस्तास आज्ञा घेऊन पुण्यास आले.

ताराबाई साहेब यांणीं शेवटवर महाराजांनीं स्वतंत्र राहून राज्यभार करावा हें घडों दिल्हें नाहीं. आपले नजरबंदींत ठेविलें. आपणच सर्व कारभार करावा या इच्छेनें केलें. त्यांत प्रधानपंत यांनीं सर्व आटोप करून चालले. नंतर आईसाहेब बहुत करून वृद्ध जाल्ीं. शरीरीं व्यथा होऊन वारलीं. शके मजकूर.

पूर्वी बाळाजीपंत नानांचा संकल्प राजाराम यांणीं स्वतंत्र राहून राज्यभार चालावा, ऐसा होता. परंतु आईसाहेबांचे आग्रहानीं चाललें नाहीं. तें सिद्धीस जावें, [ असें माधवराव यांच्या चित्तीं आलें. ] नाना प्रकारचे बखेडे जाले, पाणपतावर दौलत गर्द जाली, सदोबा भाऊ व विश्वासराव गेले, नानासाहेब यांसही एक प्रकारचें दुखणें होऊन गेले, [ हें मनांत येऊन ] महाराजांनीं खालीं राहून [ कारभार करावासें ] केलें. आपणाकडील कारभारी एक जवळ मुतालकीचे कामावर राहिले [ ते ] आणि महाराजांकडील सर्व कारभारी अमात्य व सचिव चिटणीस व खासनीस कारखानदार रहावे. हुजूरचे महाल वतनें किल्ले ठाणें वगैरे यांचे अमलेदार करणें ते महाराजांनीं पाहिजेत ते करावे. गायकवाड, सेनासाहेब सुभा व सचिव व मंत्री व सरदेशमुखी, आंग्रे वगैरे यांच्या नेमणुका ऐवज ठराव येणें ते हुजूर यावे. असें करून त्रिंबकराव सदासिव पुरंदरे यांचे पुत्र महिपतराव त्रिंबक [ हे मुतालिकीवर ] ठेविले. महाराज वाड्यांत राहोन वाडा नीट करणें

---

१०. गर्द=नष्ट.

र यांस तालुकदारांकडे वराता करून ऐवज आणून नीट करविला. सर्व मुत्सदी प जवळ राहून काम कारभार कागदपत्र, व मामले विल्हेस लागणें करूं लागले. छ महाराजांस कन्या दोन्ही जाल्या. त्यांचें लग्न करावयाच्या वराता भोंसले, गायक-काड यांजकडे ऐवजाच्या करविल्यी.

रघु माधवराव बल्लाळ वस्त्रें घेऊन पुण्यास आल्यानंतर निजाम अल्लीखान यांणीं प्रध घाड करून भागानगराहून चालून आले. माधवराव प्रधान व रघुनाथ घे ,जीराव फौजेची तयारी करून चालून गेले. मं ज र था [?] नजीक गांठ ल डली. नबाब बेदरचा घांट उतरोन आले. तेव्हां [11]हरोळीस मोंगल अल्ली सा बाबाचे भाऊ व रामचंद्र जाधवराव होते. त्यांस भेद करून रामचंद्र जाधवराव य यांस सेनापतीपद व जागीर देण्याचें ठरावून मोंगल अल्लीस सुभा द्यावा ऐसें र करून त्यांस फोडून आणिलें. नबाव हलके [12]पडले. परंतु तसेच चालून आले. । लढाई सुरू जाली. या लढाईंत दमाजी गायकवाड यांनीं तरवार केली. प्रधान यांणीं [13]गनीमी भोंवतीं फौज फिरवून लढाई करूं लागले. नबाब पारगांव भीमा नजीक तसेच आले. पुण्यास यावें, लुटावें हें मनांत धरिलें. तेव्हां भोंवतें जाळोन रसद बंद केली. दाणा वैरण मिळेना याजमुळें आयास आले. आणी तह करून निघोन माघारे गेले. प्रधानपंत पुण्यास आले.

यानंतर कर्नाटकचे स्वारीस गेले. बरोबर त्रिंबकराव बिश्वनाथ पेंठे घेतले. कर्नाटकच्या खंडण्या घेऊन सिरे पर्यंत जाऊन माघारे पुण्यास आले. शके १६८४ चित्रभानुनाम संवत्सरे सन सल्लास सितेन मया व अल्लफ. जवळ कार-भारी त्रिंबकराव बिश्वनाथ व बाबूराव फडणीस व गोपाळराव गोविंद पटवर्धन [16]आत्मीक जाले. रघुनाथराव यांजमध्यें किंतु वाढला. तेव्हां रघुनाथ बाजीराव निघोन गंगातीरास गेले. त्याजपाशीं कारभारी नीलकंठ महादेव पुरंदरे व सखाराम भगवंत त्यांचे पदरचे होते ते बहुत शहाणे मनसब्यांत निपूण निघाले, व महिपतराव त्रिंबक चिटणवीस व नारो शंकर राजे बहादर व विठ्ठल शिव-देव हे आपले लक्षीं घेतले. प्रधानपंतही तयारी करून चालून गेले. रघुनाथ-पंत फौजसुद्धां चालून परत आले. भीमातीरीं गांठ पडली. लढाई मातबर जाली. यांत माधवराव यांचा पराभव जाला. फौज पळूं लागली. तेव्हां प्र-

---

११. महाराजांस याप्रमाणें स्वतंत्रता दि-ली ही गोष्ट माधवरावास मोठें भूषण हो-य. यावरून त्यांचें औदार्य व पोक्तपणा हे गुणही व्यक्त होतात.

१२. हरोळी=टेहळणी करितां पाठविले-ली टोळी, अवाडी.

१३. हलके=कमा, कमजोर.

१४. गनीमी=हें विशेषण 'लढाई'कडे घ्यावें.

१५ हयास ? हयास आले=थकले.

१६. आत्मिक=अंतस्थ, मेहेरबानींतले !

धानपंतीं वडील आहेत, करतील तें करोत, म्हणोन जाऊन भेटले. तेव्हां त्यांज- पाशीं आपले लोक कारभारी येऊन नजरबंद दाखल ठेविले. गोपाळराव गोविंद मिरजेकडे गेले. त्रिंबकराव निघोन पुण्यास आले.

या नंतर शके १६८४ चित्रभानुनाम संवत्सरे सन सल्लास सितेन मया व अलफ यांत राजाराम साहेब यांच्या उभयतां कन्यांचीं लग्नें जहालीं. एक महादजी नाईक निंबाळकर यांजकडे दिल्ही व एक दुर्गोजी महाडीक ताराराव कर यांजकडे दिल्ही. मोठा समारंभ केला. भोंसले, गायकवाड, आंगरे यांनी वर वराता खर्चाच्या करून, हुजरे पाठवून, ऐवज व हत्ती, घोडे, जिन्नस आणिले.

[ इकडे ] मोंगल व भवानराव प्रतिनिधी व यमाजी शिवदेव व भोंसले जानोजी सेनासाहेब सुभा व गोपाळराव गोविंद पटवर्धन व पिराजी नाईक निंबाळकर ऐसे सर्व एक होऊन पुणें, सातारा येथें चालून येणार हें कळविले त्यावर माधवराव बल्लाळ प्रधान व रघुनाथ बाजीराव फौजसुद्धां त्यांजवर रवाना केले. हुजूर खासगीचे महाल व गांव वतनी अमल यास अमलदार नवे जुने करून करार केले. हुजूरचे कारखाने हत्ती पागा वगैरे सर्व वहिवाट व नेमणु- की ऐवज खर्चास येणें ऐसें चाललें. दमाजी गायकवाड यास सेनाखासखेल पदाचीं वस्त्रें दिल्हीं. गोविंदराव गायकवाड मुतालीक व येशवंतराव कारभारी याप्रमाणें महाराजांनीं वस्त्रें दिल्हीं. शके मजकूर.

माधवराव यांनीं निजामअल्ली यांजकडे राजकारण पाठविलें होतें. कुमकेस यावें म्हणोन बालेघाटीं आले. प्रसंग जाला. नबाबाचे कारभारी विठ्ठल सुंदर होते. त्यांनीं रघुनाथपंतांकडे राजकारण भेटीचें पाठविलें. आणि नबाबासुद्धां आले. परस्परें निखालसता होऊन मेजवान्या नबाब व कारभारी यांच्या होऊन नबाब माघारीं गेले. रघुनाथ बाजीराव प्रधानपंत सहवर्तमान पुण्यास आले. शके १६८५ सुभानुनाम संवत्सरे सन अर्बा सितेन मया व अलफ.

[ यानंतर ] सर्व कारभार रघुनाथपंत करूं लागले. आणि सखाराम भग- वंत कारभारी कुलकुला[१७] जहाले. अष्टप्रधान यांच्या पदांच्या घालमेली कराव्या सातारां महाराज यांचा बंदोबस्त आपले लगामीं असावा, हा विचार करून गोपाळराव गोविंद पटवर्धन निघोन गेले त्यांचें पारपत्य करावें, यावरून सातारियास गेले. आपणासही पद मोठें असावें, प्रधान वडील [ ? ] तेव्हां त्यांचे बराबरीचें असावें. भास्करराव पुत्र जहाले होते, त्यांचे नांवें करावें. परंतु लहान तेव्हां त्यांचे नायब नारो शंकर राजे बहादर प्रतिनिधी करावे. ऐसें निश्चयांत आणोन महाराजांस मेजवानी वगैरे मनोधारण करून प्रतिनिधी पद राजे बहादर यांस देविलें

१७. कुलकुला=कुलकुल्ला=सर्व प्रकारचा | अधिकार आहे ज्यास–कुलमुख्त्यार.

बराबवेठ्ठल शिवदेव यांस न्यायाधिशी पद देविलें. सेनापति पद दाभाडे यांजकडी-फौज दूर करून रामचंद्र जाधवराव यांस देविलें. सरलष्करपद कान्होजी मोहिते यांस शेवटनिंबाळकर यांचें काढून बाळाजीपंत नाना यांणीं दिल्हें होतें तें काढोन खंडेराव हैबतरेकर यांस सरलष्कर पद देविलें. आणि महाराजांची आज्ञा घेऊन मिरजेस तीन गेपाळराव यांजवर मसलत करून मिरज किल्ला घ्यावा म्हणोन गेले. ते समयीं निघोन बाबूराव फडणीस व त्रिंबकराव विश्वनाथ पेंठे हे बाबूजी नाईक जोशी यांणीं संवत्संरबदली करून भेटविले[१८]. मिरजेस मोर्चे दिल्हे. सवा महिना किल्ला लढ-मुधोग. नंतर घेतला. तो शिवाजी बेंढाळ यांचे स्वाधीन केला. गोपाळराव धोजीगोविंद यांजवर फौज रवाना केली. लढाई झाली. ते मोड होऊन पळून होतामोंगलाईंत गेले. प्रतिनिधीपदाची घालमेल जहाली म्हणोन भवानराव प्रतिनिधी देऊन यमाजी शिवदेव, गमाजीपंत प्रतिनिधीचे मुतालीक हे नवाबाकडे निघोन गेले. फिर बाबूराव फडणीस यांचे पुत्र मोरो बाबूरावही मोंगलाईंत गेले. यमाजीपंत व घेत गमाजीपंत व गोपाळराव गोविंद यांणीं बिठ्ठल सुंदर यांचे हातें नवाबासही बोलणें राजकारण सिद्ध करून जानोजी भोंसले सेनासाहेबसुभा, व बिठ्ठल सुंदर, विनायकराव, व भवानराव प्रतिनिधी, यमाजीपंत, सदाशिव रामचंद्र, पिराजी नाईक निंबाळकर यांशीं राजकारणें करून आणविले. आणि नबाब भोंसले सुद्धां चालोन आले. आणि सखाराम भगवंत, मल्हारजी होळकर वगैरे यांनीं मसलत केली जे, प्रथमच लढाई देणें ठीक नाहीं. भोंवतें हिंडून किल्ले, कोट, स्थळें यांचे बंदोबस्त राखावे. पुणें पर्यंत ते येणार तेव्हां शहर उजाड करावें. आपण भागानगर प्रांतीं जावें. म्हणून माधवराव यांजपाशींही निखाल-सतेचीं बोलणीं करून प्रधानपंत फौजेसुद्धां भागानगर प्रांतीं निघोन गेले. नवा-ब यांनीं विचार केला जे, यमाजीपंत व गमाजीपंत व गोपाळराव हे माहीतगार यांनीं फौजा घेऊन किल्लेकोट घ्यावे. सातारां जाऊन किल्ला घेऊन राजे यांस घेऊन यावें. यावरून दोन टोळ्या यमाजीपंताचे पुत्र गमाजीबावा, सातारियाकडे फौज सुद्धां निघोन मुलुक मारीत खंडणी घेत चालले. यमाजी-पंत व गोपाळराव येऊन पुणें पर्यंत शहर लुटून हवेल्या जाळल्या. सिंहगड लोहगड येथील माच्या लुटल्या. किल्ले वेढूं लागले. सातारां राजकारण सिद्ध जालें. महाराज किल्यावर गेले. प्रांत लुटला, जाळला. "मोंगलास मि-ळाले, मोंगलाई करणार म्हणोन राजकारणास गेले; त्यास आम्हीं उतरावयाचे नाहीं" असें महाराजांना सांगितलें. ते गमाजीपंत माघारे फिरले. प्रधानपंत

---

१८. यांचें व दादांचें वांकडें असण्याचें कारण हे दोघेही पूर्वी माधवरावाच्या पक्षांत सामील होते.

१९. हे माधवरावाचे श्वशुर असावे.

अनुक्रमणिका

भागानगरीं जाऊन पुरे मारिले. प्रांत लुटला हें वर्तमान आलें. व यमाजीपंत करर व गोपाळराव हेही फिरले. किल्ले येणें वगैरे सातारां राजे येणें कांहींच न जालें. तेव्हां नवाबांनीं ही गोष्ट ठीक नाहीं म्हणोन माघारें फिरले. आगोट आली त्या छावणी औरंगाबादेस करून पुढें मसलत करणें ती करावी, ऐसा निश्चय करूनरूपना गंगातीरीं आले. त्या समयीं भोंसले वगैरे सरदार मुत्सद्दी यांस राजकारण पाठ उग्र. विलें जे, गोष्ट जाली ते मनांत न आणितां सर्व कामें पदें ज्यांचीं त्यांजकडोकळे चालवून राग कोणाचा न करावा. ऐसें मल्हारजी होळकर यांचे विद्यमानें तहारा. दरम्यान होळकर द्यावेसें करून सर्वांनीं नवाबापासून भोंसले सुद्धां निघावेंसेंवेच राजकारण सिद्ध केलें. नवाब शहरास जाणार तेव्हां भोंसले गंगातीरीं रहातोंतास म्हणोन त्यांस सोडून राहिले. नवाब गंगा उतरून खांसा पलीकडे गेलेशांचे तोफखाना उतरावा तों पाणी गंगेस बहुत आलें. तेव्हां नांवेवरून उतरूनाराव नंतर आपण उतरोंव म्हणोन सडी फौज कांहीं ठेवून घेऊन विठ्ठल सुंदर व विनायकदास आलीकडे राहिले. हे बातमी प्रधानपंत व रघुनाथपंत यांस कळली. यावरून चालून गेले. त्यांची यांची लढाई बहुत तारफेची जाली. बहुत लोकांनीं कामें केलीं, यांत बाबूराव हरी व सखाराम हरी यांणी शिपायगिरी बहुत केली. जखमा लागल्या. यावरून वाढविले. महिपतराव चिटणवीस यांणींही तरवार मारिली. त्यांसही पृथक सरंजाम देऊन वाढविले. विठ्ठल सुंदर व विनायकदास व मुरादखान यांणीं अंबारींत बसोन तिरंदाजी करूनयांस बहुत लढले. तेव्हां विठ्ठल सुंदर व विनायकदास यांस गोळ्या लागून ठार जाले. फौज बुडविली व लुटली. विठ्ठल सुंदर मारले. शके १६८५ सुभानुनाम संवत्सरे छ १९[21] मोहरम सन आर्बासितेन मया व अैलफ.[22]

नंतर नवाब निघोन औरंगाबादेस गेले. प्रधानपंतांचीही फौज मागून जाऊन शह दिल्हा. तेव्हां तह करून कांहीं जागीर दिल्ही. ते घेऊन पुण्यास आले नवाब निघोन भागानगरास गेले. भोंसले निघोन नागपुरास गेले.

यानंतर माधवरावपंत प्रधान फौजेची तयारी करून कर्नाटकचे स्वारीस दुसं वर्षीं निघाले ते खंडणी घेत श्रीरंगपटणापर्यंत गेले. ते समयीं हैदरनाईक म्हणोन जमातगार गार्दी यांचे सरदार होते. त्यांणीं श्रीरंगपट्टणचे राजे[23] यां कैद करून आपणच तें स्थान बळावून होते. त्यांची गांठ पडली. तेही फौ

---

२०. हे दोघेही परभू गृहस्थ होत पैकीं सखाराम हरी दादांचा परम मित्र होता. बाबूराव हा सखाराम हरीचा बंधु असावा.

२१. 'छ २३' इंदूर प्रत.

२२. ही राक्षसभुवनची लढाई.

२३. हा कुंमार राजा शालिवाहनाचा वंशज असल्याबद्दल कोठें कोठें ले आढळतात.

चालून आले. लढाई मातबर झाली. त्यांत हैदरनाईक यांचा मोड झाला. झाडींत गेले. तेव्हां बरसात आलियावरून बालानदी आलीकडे येऊन गो नरेंद्रगडानजीक केली. पलीकडे हैदरनाईक यांणींही झाडींत छावणी राहिले. पंतप्रधान यांणीं श्रीगणपती चतुर्थीचा उत्छाह तेथेंच केला. ाथ बाजीराव पुण्यास येऊन निघोन गंगातीरास आनंदवल्ली येथें गेले. नपंत यांणीं आबदुल गनीमखान सावनूरकर पठाण व हिंदुराव मुरारराव डे यांस कुमकेस बलाविलें. ते तयार होऊन आले. मुरारराव यांणीं बो- घातलें जे, पूर्वीं आपले वडील संताजी घोरपडे यांणीं बहुत सेवा श्रम केलें. राज्यवृद्धीचे कामास आले. संस्थान चालतें, परंतु सेनापतीपद आप- द्यावें. आणि पुढें आणखी सेवा घ्यावी. ऐसें बोलणें घातलें. ते समयीं रामचंद्र वराव यांजकडे सेनापतिपद रघुनाथपंत यांणीं देविलें होतें. ते गुजराथ आपणाकडे द्यावा ऐसें बोलूं लागले. तेव्हां निंमे प्रांत प्रधानपंत यांजकडे निंमे गाईकवाड व दाभाडे यांजकडे तो काढून देणें न जालें. यावरून वराव फिरोन मोंगलाईंत गेले. प्रधानपतांनीं महाराजांस सातारियास पत्रें विलीं जे, [ घोरपडे ] पूर्वींचे पदरचे पदाधिकारि व हल्लीं या मसलतीचे ोगीं यास्तव पद वस्त्रें यांस द्यावीं. त्यावरून पदाचीं वस्त्रें पाठविलीं. शके ८७ पार्थिवनाम संवत्सरे सन सितेन मया व अलफ. घोरपडे यांस बहुमान देऊन सेनापतीपद दिल्हें. व सहा लक्षांचे महाल कर्नाटक प्रांतीचे दिल्हे.

यानंतर दसरा जालियावरि कूच करून धारवाडास गेले. तेथें किल्यास र्चे बसविले. आणि सुरंग लावून हल्ला चढविला. तोफांनीं मारगिरी करून किल्ला केला. तेव्हां किल्लेकरी यांणीं कौल घेऊन किल्ला स्वाधीन केला. तेथें ठाणें विलें. तदनंतर हैदर नाईक बिदनूरचे झाडींत शिरून राहिले होते त्याजवर ून गेले. तेव्हां हैदरनाईक यांणीं जागांजागां बतेरे[२४] बांधून तोफा चढवून बारींत[२५] येऊं नये अशी मजबुदी करून झाडींत गारद[२६] ठेविले. त्याचा ाब न धरितां तोफा लावून बतेरे घेऊन मुरगूडचे ठाण्यास मोर्चे देऊन ले. व आणखींही ठाणीं घेतलीं. हैदरनाईक बिदनूरचे आश्रयास गेले. समयीं रघुनाथपंत वडील गंगातीरीं गेले ते समजून आणोन सख्य करून लावें म्हणोन चिंतो अनंत देवस्थळे पाठविले. यावरून तेही येऊन पावले. ानपंत कर्नाटकांत झाडींत शिरून अनंतपुरास मोर्चे लावून घेतलें. हैदरनाईक

२४. बतेरे=बुरूज, धमधमे.
२५. बारी=अरुंद मार्ग, खिंड.
२६. गारद=कवायती लोक.

यांणीं विचार केला जे, आपणास या उपरि बुडवितात. असें समजून तहाचे राजकारण केलें. खंडणी सालाबाद पंधरा लक्ष रुपये व मैसैलतीचा पैका कबूल केला तें राजकारण रघुनाथपंत यांचे विचारें सिद्ध केलें. प्रधानपंत [यांणीं] ये समर्‍ निकर्ष आग्रह करावा तरि वडिलांची मर्जी जाती ऐसें समजोन तहाचें बोल ऐकून तह करून पुण्यास आले.

यानंतर दुसरे वर्षी प्रधान कर्नाटकांत स्वारीस निघाले. रघुनाथ बाजी हिंदुस्थानची स्वारी करावी म्हणोन तिकडे गेले. माधवराव प्रधानपंत जाऊ शिरें येथें मोर्चे देऊन किल्ला घेतला. तेथें मुकुंद श्रीपत किलियांत ठेवि पुढें जाऊन मदगिरी व चैनरायदुर्गही घेतलें. यानंतर होसकोट व *चिकब ळापूर व थोरलें बोळापूर घेऊन अमल बसविला. सर्व राज्य सोडविलें. आणि आरकाटची स्वारी करावी असा रोख धरिला. आरकाटावर प्रधानपंत येता हें समजोन महमदअल्ली पठाण यांणीं वकील पाठवून तह ठरविला. सालाबा खंडणी ठरविली.

यानंतर सर्व संस्थानीं व पाळेगार देशक यांणीं येऊन खंडण्या ठराविल्या शरणागत जाले. याप्रमाणें फत्ते करून पुण्यास यावें म्हणोन देशीं आले. तें रघुनाथराव दादासाहेबही स्वारी करून कासारबारी चढून आले. म्हणोन माधवराव साहेबही पुढें भेटीस गेले. ते समयीं कांहीं बोलणीं जालीं. विकल्प वाढून भेटीचा बेत न ठरला. दादासाहेब आनंदवल्लीस गेले. प्रधानपंत पुण्यास आले. या उपरि बहुतच किंतु उभयतांचें बोलणें वाढत चाललें. रघुनाथ पंत यांचें बोलणें आपणांस प्रांत वांटून द्यावा. तेव्हां फौजा धरून गंगातीरीं आले. प्रधानपंतही गेले. धोडपच्या किल्यानजीक त्यांची यांची लढाई जहाली यांत रघुनाथपंत यांची फौज मोडली. तेव्हां त्यांस घेऊन पुण्यास आले. य उपरि वाड्यांत स्वस्थ स्नान संध्या करून असावें, जवळचे लोक व कारभारी यांणीं जवळ जाऊं नये, म्हणोन ऐसें करून चौक्या ठेऊन बंदोबस्त केला तेव्हां वाड्यांतच राहिले. पंतप्रधान कर्नाटकांतून देशीं येतां त्रिंबकराव विश्व नाथ पेंठे मुख्य सरदार फौज देऊन सखाराम हरी यांस फौजेचें काम सांगो

---

२७. मसलत=मोहिम.

२८. यावेळीं हैदर इतका जेरीस आला होता कीं त्याजपासून आपला मुलुख व पैका मिळाला असता. पण तहाप्रकरणीं सर्व बोलणें दादाकडे त्यांच्या समजावणी-खातर सोंपावीलें असल्याकारणानें असा तह केल्यावर माधवरावास ज्यास्त बोलतां येईना.

* चिक=छोटें.

२९. "थोरलें सोलापूर" चि० प्रत हें चुकीचें दिसतें.

३०. देशक=देशमुखासारिखे वतनद कामगार.

र दिल्हें. त्यांनीं हैदरनाईक यांशीं लढाया बहुत तारफेच्या केल्या. सडी
ड नेहमी पांच हजार सखाराम हरीनीं घेऊन छापे घालणें, प्रांत मारणें, केलें.
ां गांठ पडून लढाई मातबर जाली. लोकांनीं कामें बहुत शर्तेचीं केलीं.
नाईक मोडून लुटून घेतले. पाय उतारा सडे पळून श्रीरंगपट्टणास गेले.
र्षे छावणी करून सर्व प्रांत हस्तगत केला. आणि पुण्यास यावयास
रि आले. पुढें जानोजी भोंसले यांचा काळ शके १६९४ नंदन नाम
र सन सल्लास सबैन मया व अलफ यांत जहाला. दत्तक रघोजी भोंसले हे
पजी भोंसले यांचे पुत्र दिल्हे. त्यास सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें दिल्हीं. मु-
जी भोंसले यांस सेनाधुरंधरपदाचीं वस्त्रें दिल्हीं. प्रतापगड किल्ला हुजूर
र तो माधवराव पिंगळे यांचे स्वाधीन होता त्यास दहा हजारांचा सरंजाम
न आपणाकडे असावा म्हणोन त्यास पुण्यास आणोन महाराजांकडे किल्याचा
र जहाला. त्याचें रक्षण जालें पाहिजे असें समजोन सनदा आणोन
ल्या शके * * * * *

तदनंतर रायगड किल्ला महाराजांचे खासगीस होता तो विठ्ठल येशवंत खास-
वस यांजकडे तालुका सुद्धां होता त्यास प्रधानपंत यांनीं वाड्यांत बोलावून
न बसविलें. आणि जबरदस्तीनें सोडचिट्या घेतल्या. किल्लेकरी यांणीं
दा खेरीज देत नाहीं म्हणोन किल्ला लढवूं लागले. दिल्हा नाहीं. हिंदु-
ान प्रांतीं स्वारीस दादासाहेब यांचें जाणें राहिलें. तेव्हां रामचंद्र गणेश व
साजी कृष्ण हे सरदार नेमोन तुकोजी होळकर व महादजी शिंदे फौज सुद्धां
न रवाना केले. रामचंद्र गणेश यांचें व शिंदे यांचें बनेनासें जालें. तेव्हां
ारे आणिले. व बिसाजी कृष्णच मुख्यत्वें नेमून बाबूराव हरी वगैरे सरदार
ज बराबर दिल्ही. मल्हारजी होळकर वारले. त्यांचे पुतणे कर्ते तुकोजी
ळकर यांसच सरदारी दिल्ही. व जनकोजी शिंदे पाणीपतीं राहिले त्यांची
दारी राणोजी शिंदे यांचे पुत्र महादजी शिंदे कर्ते निघाले त्यांसच सरदारी
ल्ही. विसाजी कृष्ण व शिंदे, होळकर हिंदुस्थानांत गेले. त्यांनीं त्या
तींच्या सर्व खंडण्या घेऊन संस्थानिकांचीं पारिपत्यें करणें त्यांचीं केलीं. नजी-
बान रोहिले यांणीं पूर्वीं पाणीपतीं घालविलें त्याचें पारिपत्य करावें म्हणोन गेले.
जीबखान याचे लेंक जाबीदखान होते. तेव्हां भागीरथीची प्रार्थना प्रधानपंत
चे फौजेनें केली. ते समयीं उतार दिल्हा. पलीकडे गेले. जाबीदखान
ार होऊन लढाईस आले. मातबर लढाई जाली. रोहिले बहुत मारिले, त्यांचा
जाला. जाबीदखान धरिले. फत्तरगड त्याची राहती जागा, बहुत नामी

अनुक्रमणिका

किल्ला तो घेतला. मालमत्ता बहुत नामी सांपडला तो घेऊन शिंदे हो फौजा देशीं यावयास निघाले.

माधवराव साहेब प्रधान यांचे शरीरीं राजयक्ष्मा रोग प्राप्त जाला. येणें करून बहुत क्लेश होऊं लागले. यावरून चित्तांत का केली जे, दादा साहेब यांस नजरबंद ठेविलें. त्यांचें अनुष्ठान बहुत सर्वकाळ सूर्य अवलोकन हरणीचें दुध भक्षण चाललें. त्यांचे प्रतिबंध करावे त्यांचे मर्जीनें वागवेसें केलें. परंतु त्यांनीं आग्रहान चालविलें. म जांस पीडा होते ते होऊं नये, त्यांनीं आपला संतोष करून आपला खर्च डीलाचा बंदोबस्त करावा, त्याचे मर्जीनुरूप चालावें. ये विशीचे बंदोब महिपतराव त्रिंबक बजाबा पुरंदरे कारभारी सातारां ठेविले. त्यांनीं महारा विचारें चालावेसें केलें. जगजीवन परशराम प्रतिनिधी वारले. तेव्हां भवान यांसि प्रतिनिधीपद दिल्हें. मध्यें भगवंतराव यांस प्रतिनिधीपद दि होतें, तें फिरवून भवानराव यांस दिल्हें. माधवराव साहेब यांचे शरीरीं जाली. थोडक्या वयांत मसलती व पराक्रम बहुतच केले. परंतु शरीरीं रोग प्रबलता विशेष, सर्वकाळ अंगाचा दाहा. तेव्हां केळीच्या पानाच्या सुरळ्या आण त्याजवर निजावें. तेव्हां कांहीं चैन पडावें. ऐसें जालें. ते समयीं थेऊर जाऊन राहिले. कर्ज आपले कारकीर्दीचें वारावें म्हणोन खासगी खजीना तेथील एक कोट रुपये देऊन कर्जे वारिलीं. नारायणराव धाकटे बंधु बोलावून नेऊन आपले तीन हेतु राहिले [ ते कळविले.] महाराजांस पीडा हो स्वामिद्रोह घडतो, याजकरितां तेथील मर्जी रक्षून पूर्वी सांगोले मुक्कामीं तह आहेत. त्याप्रमाणें चालावें. सदाशिवपंत भाऊंनीं निग्रह केला ते पाणीपतीं बु नानासाहेब यांचे बुद्धीची खंबीरता ढळली, आमचे शरीरीं अशी पीडा ज यास्तव तेथील मर्जी रक्षून चालावें. दादा साहेब वडील त्यांचे आज्ञेनें दौ त्यांचे विचारें चालवावी. तिसरे रयतेस जलाल जाजती होऊं नये, पदरचे दौलतींतील मनुष्यें लहान मोठीं आहेत त्याचें मनोधारण रक्षून त्यांचे योग्यतेनु चालावें. सर्वांचें संरक्षण करावें. म्हणजे तुम्हांस यश प्राप्त होईल. दौ यथास्थित चालेल. याप्रमाणें सांगितलें.

यानंतर माधवराव साहेब यांचे शरीरीं बहुतच क्षीणता होऊन थेऊर येथें के १६९४ नंदननाम संवत्सरे सन सल्लास सबैन मया व अल्फ. का मासीं वारले. रमाबाई सहगमन गेलीं. पोटीं संतान नाहीं. तेव्हां नाराय राव यांनीं त्यांचे उत्तरकार्य करून, सातारियास महाराजांकडे गेले. महा सामोरे येऊन बहुत सन्मान केला. महाराजांचें मनोधारण जे जे आज्ञा ज

[.]दे यांणीं करून देतों ऐसे करार ठरविले. प्रधानपदाचीं वस्त्रें सुमुहूर्ते [.]मार्गशीर्ष मासीं शके मजकुरीं दिल्हीं. बहुमान सांप्रदायाप्रमाणें जवाहीर [.] घोडे, शिक्केकटार, पट्टा ऐसें दिल्हें. यांनीं महाराजांस मेजवान्या वगैरे [.]नोधारणान्वयें बंदोबस्ताच्या यादी करून पुण्यास जाऊन तेथील बंदो[.] [.]न स्वामींचे आज्ञेप्रमाणें येथील करितों ऐसें बोलोन निरोप घेऊन निघा[.] [.]मुळें महाराजांची मर्जी राहिली नाहीं. रायगड किल्लेकरी भांडत होते. [.]वशी यानीं फितूर केला ऐसें महाराजांस समजावून सनदांची परवानगी [.]किल्ला घेतला. शके १६९५ विजयनाम संवत्सरे सन आर्बा सबैन [.]मल्लफ. चैत्र शु॥ १.

[.]र दादा साहेब यांची कन्या पांडुरंगराव बारामतीकर यांस देऊन समा[.] [.]न लग्न केलें. पुणियास येऊन दौलतीचा व फौजेचा बंदोबस्त करून [.]स्वारी करून पराक्रम करून दाखवावा हे उमेद बहुत धरिली. शरीरीं [.]ही नूतन हरी बल्लाळ फडके, बाबाजी बर्वे हे कारभारी बहुत कपेंत [.]ले. सखारामपंत बोकील व बाळाजी जनार्दन फडणीस व त्रिंबक[.] [.]व मोरो बाबुराव फडणीस वगैरे मोठीं माणसें जवळ होतीं. त्रिंब[.] [.]टकांत तीन वर्षे राहून फत्ते करून येऊन भेटले. विसाजी कृष्ण [.] फत्ते करून येऊन पावले. शिंदे होळकर येऊन भेटून फिरोन [.]ऊन हिंदुस्थानांत रवाना जाले. दादासाहेब यांचे ठायीं चित्तशुद्धि [.] अधिकच बंदोबस्त निक्षींचौं केला. याजमुळें सुमेरसिंग व खरग[.] [.]महमद इसफ जमातदार गारदी वगैरे मिळोन फितूर जाला. एकाएकीं [.] चौक्यांचे लोक फितूर करून वाड्यांत तलबेसाठीं म्हणोन जाऊन [.]ली. तेव्हां नारायणराव यांजला गलबल फितुराचीशी कांहीं समजल्या[.] [.]वून रघुनाथराव यांजकडे गेले. तेव्हां त्यांनीं पुढें होऊन नारायणराव [.]शीं धरिलें. मारूं नये म्हणोन सुमेरसिंग वगैरे यांस सांगत असतां [.]केलें नाहीं. गर्दी जाली. तरवार चालली. तेथें ठार जाले. आ[.] [.]लोक इच्छारामपंत ढेरे व चापाजी टिळेकर खिजमतगार वगैरे ठार [.] तेव्हां दादासाहेब यांनीं वाड्यांतील बंदोबस्त केला. हें वर्तमान [.] कारभारी मिळोन फौजा तयार करून उभे राहिले. त्यांस आंत काय [.]ले, हें कांहींच न समजे. तें सांगोन पाठविलें आणि कारभारी मंडळी [.]दादा पुरंदरे व त्रिंबकराव विश्वनाथ व भवानराव प्रतिनिधि ऐसे मिळो-

[.]आ बर्व्यांविषयीं विशेष माहिती [.]नाहीं.

३२. निक्षीचा=निकर्षाचा, कडक.

३३. तलब=पगाराची बाकी.

न आंत वाड्यांत गेले. दादासाहेब यांची भेट जाली. सर्व वृत्त जा समजलें आणि मंडळी गेली. त्याचा दीलदिलासा करून सर्व बंदोबस्त शके १६९५ विजयनाम संवत्सरे. सन आर्बा सबैन मया व अल्लफ. ३ शुद्ध १३ त्रयोदशी. नारायणराव यांणीं माधवराव यांचे मागें नऊ मा ज्य केलें. राघोजी आंगरे कुलाब्याहून आले. त्यांची भेट घेऊन आले. तेच दिवशीं गर्दी होऊन नारायणराव मारले गेले. त्यांची स्त्री दर होती.

पुढें अश्वीनमासीं रघुनाथ बाजीराव यांनीं फौजेची तयारी करून डेरा जाले. आणि नवाबाशीं बिघाड करून त्याजवर स्वारीस जावें. ऐशी केली. अश्वीन शुद्ध १० दशमीस सन मजकुरीं स्वारीस निघाले. यास जाऊन वस्त्रें ध्यावीं तें न करितां परभारें भीमातीरीं जाऊन प्रधानप वस्त्रें रघुनायराव दादा यांणीं आपले दत्तपुत्र अमृतराव आनंदवल्लीस घेतले ते व महिपतराव त्रिंबक पुरंदरे यांस सातारां रवाना केलें. वस्त्रें आणि स्वारी फते करून नंतर दर्शनास येऊं ऐसें सांगून पाठविलें. वस्त्रें घेऊ मृतराव आले, तेव्हां भीमातीरींच होते. शिक्का नवाच केला त्यांत राज नांव न घालतां शाहू महाराज हें नांव घालून केला. आणि दरमजल बेदर प्रांतीं गेले. नवाबही तेथें चालून आले. रघुनाथराव दादा यांणीं यांस बोलाविलें. ते समयीं मुधोजी भोंसले सेना धुरंधर फौज सुद्धां जाते समयीं सिद्धटेकीं येऊन भेटले. तेथें रघोजी भोंसले यांचे नांवें साहेब सुभ्याचीं वस्त्रें दिल्हीं. सन मजकूर.

बेदरास नबाब यांचे भोंवतालचे फौजेनें घेरा दिल्हा. नवाब किल्यांत यांनीं किल्यास महांकाळी वगैरे तोफा लाविल्या. याजवरून कृष्णराव बल्लाळ ल तेथें होते. त्यांस नवाबांनीं वीस लक्षांची जागीर घेऊन तह करावा पाठविलें. परंतु रघुनाथ बाजीराव यांणीं आग्रहच धरिला. ते समयीं खांसा व रुकनुद्दौला कारभारी यांणीं बातमी कळूं न देतां सडे शें दोनसें निशीं डेऱ्यासमीप येऊन आम्ही भेटीस आलों असें सांगोन पाठविलें. हें तांच डेऱ्या बाहेर दादासाहेब आले. तों ते येऊन पोंहोचले. भेटी जा डेरियांत जाऊन बसले तों नवाबांनीं एक बान[34] गळ्यांतील काढून व तरवार पुढें ठेविली. दौलत तुमची आहे पाहिजे तसें करावें. दाली[35] पि पाहिजे तरि बांधावी, किंवा ध्यावी ऐसें बोलले. तेव्हां दादा

३४. वान. ? | ३५. दाली—तरवार बांधावयाचा प

कंसभूपति असा बहु भ्याला । कृष्णरूप चि दिसे जग त्याला ॥
बैसला निजसभादलोकीं । अंतरीं मन बुडे भयशोकीं ॥ ४ ॥
चाणूरमल्लादिक दैत्यकोटी । तो मेळवी भीति धरोनि पोटीं ॥
पाचारुनी पातकि पूतनेला । वधावया कृष्ण विचार केला ॥ ५ ॥
बोले रोषुनि पूतना प्रभु म्हणे कां वाहतां काळजी
काळातें दमणार मी उमगितें बांधोनियां बाळ जी ॥
पाताळीं नभमंडळीं क्षितितळीं तो जेथ जैसा असे
तैसा शोध करोनि साधिन तुझें कार्यार्थ राया असें ॥ ६ ॥

॥ दिंड्या ॥

कंसरायें देऊनि चीरैं माळा । महा तोषाचा घेउनी उमाळा ॥
प्रेरियेली पूतना नाम बाळा । जगीं धुंडाया देवकिच्या बाळा ॥ ७ ॥
कथा ऐकें कल्याण कौरवेशा । बाळकृष्णाच्या पहा महावेशा ॥
फिरे फेरे फीरता फार सारें । ग्राम कुग्राम पुऱ्या अग्रहारें ॥ ८ ॥
मुलें सर्वत्र हि जीं तिं सकूमारें । तशा स्त्रींच्या पेटलिसे मारें ॥
होति कृष्णा जन्मोनि दिवस दाहा । तशा बाळा देखुनी उठे दाहा ॥ ९ ॥
कामरागादिक मोह जिथे साहा । तेथ कैंचा वीवेक फारसा हा ॥
हरी साठीं बाळकें लक्षकोटी । जिणें भक्षीली दीर्घ दंतकोटी ॥ १० ॥
गोकुळासी येतां चि तदा मोटी । दिसे माया चेटकी कपट पोटीं ॥
वयें सोळा वर्षांत उभी ठेली । सुतारुण्यें तारुण्य गुणठेली[१०] ॥
नंदपुत्राच्या दर्शना भुकेली । दिंडि ऐशी आनंदसुतें केली ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥

एथें असेल बहुधा शिशु कंसहंता । शोधोनि साधिन म्हणे धरुनी अहंता ॥
लक्ष्मीविलास दिसतो नगरांत भारी । तो सांपडेल मज दानवबल्लभारी ॥ १२ ॥
जेथें पद्मवनें अपार तुलसी जेथें बहू गोधनें
जेथें वैष्णव वेदपाठ करिती सद्वाक्य संबोधनें ॥
जेथें पुष्पफळीं सपल्लवदलीं शृंगार आला वना
तेथें क्रीडतसे हरी कविवरीं हे वर्णिली भावना ॥ १३ ॥
पूर्वीं हे स्थिति हा विलास सुख हें नाहीं च या गोकुळीं
आला साच गमे हरी नरहरी या नंदजीच्या कुळीं ॥

---

७ चीर=लुगडें. ८ बाळा=स्त्री. ९ दाहा=आग. १० गुणठेली=गुणांची पिशवी.

सालंकार सुंबल्लवी[11] मिरवती सौवर्णवल्ली वनीं
तैसी होइन मी न मंजुनयना मी येउनी यौवनीं[12] ॥ १४ ॥
जाली तत्काळ रंभा दिसत मृदु जिचे ऊरु[13] कर्पूररंभा[14] ॥
गंगेच्या चंचदंभासम[15] तरळ गळां हार ल्याली सदंभा ॥
मत्तेभांच्या[16] निकुंभांकाति[17] कठिण उरीं दावि वक्षोजकुंभा[18]
भासे ऐसी स्वयंभा मनिं कुटिलपणें ते रती कीं स्वयंभा ॥ १५ ॥
जाती नूतन नूतना व्रजवधू तत्संगती पूतना
आली नंदनिकेतनासि[19] निरखूं पक्षींद्रसंकेतना[20] ॥
तेथें गोवळराज नृत्य करिती कृष्णास नीरंजना
बैसे त्या च सभाजनांत निरखी योगीशहृद्भाजना[21] ॥ १६ ॥
पुढें बैसलीसे जसी मानवी ते । हरी देखुनी क्रोध दुर्मान वीते ॥
सभे अंगसौभाग्यभा[22] मानवीते । यशोदा पुसे कोण भामा[23] नवी ते ॥ १७ ॥
स्वरें[24] वदे स्वागत गोपिकांला । जें जिंकितें कंठरवें पिकांला[25] ॥
म्हणे यशोदे तुझिया मुला मा । पाहोनि धालें व्रज भूभूललामा[26] ॥ १८ ॥

॥ दिंड्या ॥

काय वानूं कापट्य कामिनीचें । इंद्रचंद्रा नेणवी रूप जीचें ॥ ध्रु० ॥
भूमिपर्यंत रुळे नीळ वेणी । वरी शोभे ती भव्य नगश्रेणी[27] ॥
चंद्र आणी शीसफुल फुलावाणी । भाळिं भांगटिला नासिकीं सुपाणी ॥ १९ ॥
चुडे कंगाणिया हातसरे दोरे । कटीं शोभाति ते भव्य कडेदोरे ॥
फार साजे सौंदर्य दैत्यदारे । कामिलोकांचे चित्त जें विदारे ॥ २० ॥
बाळ्या भोंकरें जडित ते काप कानीं । हार कंठीं देदीप्य माणिकांनीं ॥
करीं मुद्रा वीराजमान मानी । कोणि ऐसी देखुनी धैर्य मानी ॥ २१ ॥
वांकि बाहुवटें बाजुबंद बाळी । ल्यालि चोळी ते मोतियांचि जाळी ॥
हेमवसनाचा घोळ तळीं घोळी । मनीं कपटी बाहेरि दिसे भोळी ॥ २२ ॥
पदीं साखळिया नूपुरादि वाळे । बिदीं[28] चालतसे दाखवीत चाळे ॥
डोळे मोडतां चि गोपवृंद[29] भाळे । जो तो पाहे तल्लीन राजबाळे[30] ॥ २३ ॥

---

११ बल्लवी=गवळणी. १२ यौवन=तारुण्य. १३ ऊरु=मांड्या. १४ कर्पूररंभा=कर्पूरकदली (केळ). १५ चंचदंभ=हलणारें पाणी. १६ मत्तेभ=मदोन्मत्त हत्ती. १७ निकुंभ=गंडस्थळ. १८ वक्षोजकुंभ=स्तनकलश. १९ निकेतन=घर. २० पक्षींद्रसंकेतन=गरुडध्वज (कृष्ण). २१ योगीशहृद्भाजन=योग्यांच्या हृदयांत राहणारा (कृष्ण). २२ भा=कांति. २३ भामा=स्त्री. २४ रव=शब्द. २५ पिक=कोकिल. २६ ललाम=भूषण. २७ नगश्रेणी=दागिन्यांची पंक्ती. २८ बिदी=वाटेंत. २९ वृंद=समूह. ३० राजबाळा=उत्तमस्त्री (अशा प्रकारचीं दुसरीं उदाहरणें:—राजमार्ग, राजहंस, राजविद्या, रायआंवळी इ॰ ).

